**एफ.सी. बायर्न फुटबॉल क्लब, म्युनिच, जर्मनी या संस्थेशी केलेला करारनामा व स्पर्धेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण-३३२२/प्र.क्र.१५८/कीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १५ मार्च, २०२३

वाचा:-

१) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. एफसीबी/करारनामा/२०२२-२३/का-११/९८८, दि.१६ जानेवारी, २०२३.
२) उच्चस्तर धोरण समितीच्या दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त
३) शासन समक्रमांकाचे, दि. १३ फेब्रुवारी, २०२३ रोजीचे पत्र

प्रस्तावना:-

एफ.सी. बायर्न फूटबॉल क्लब, म्युनिक जर्मनी यांचेशी झालेल्या करारनाम्यानुसार, जर्मनी येथे प्रशिक्षणासाठी जाणाऱ्या महाराष्ट्रातील १४ वर्षाखालील २० मुलांची निवड करण्यासाठी जिल्हा / विभाग / राज्यस्तरावर “महाराष्ट्र फुटबॉल कप स्पर्धा” आयोजित करुन निवड चाचणीद्वारे खेळाडूंची निवड करणे व इतर तद्नुषंगिक बाबीवरील खर्च भागविण्याकरिता एकूण रु. १३०.०० लक्ष इतका निधी उपलब्ध करुन देणेबाबत संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये शासनास प्रस्ताव प्राप्त झाला आहे.

२. शिवछत्रपती क्रीडा संकुल / क्रीडापीठ, महाळुंगे-बालेवाडी, पुणे व राज्यातील क्रीडा प्रबोधिनी यांच्या संदर्भात आढावा घेऊन महत्वाचे धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी मा. मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तर समिती गठीत केली आहे. या समितीची दि. ३ फेब्रुवारी, २०२३ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये एफ.सी. बायर्न फूटबॉल क्लब, म्युनिक जर्मनी यांचेशी करारनामा करण्यास व खर्चास मान्यता प्रदान करण्याबाबत चर्चा करण्यात आली. सदर बैठकीचे इतिवृत्त निर्गमित करण्यात आले आहे.

३. याअनुषंगाने शासनाच्या वतीने आवश्यक करारनामे करणे व अनुषंगिक कामासाठी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्याबाबत सदर बैठकीत निर्णय घेण्यात आला. तसेच यासंदर्भात निधी उपलब्ध करुन देणेबाबतचा प्रस्ताव वित्त विभागास मान्यतेसाठी सादर करण्याची कार्यवाही करण्यात यावी, असे सूचित करण्यात आले. निधी वितरीत होण्यास विलंब लागण्याची शक्यता असल्याने, निधी तातडीने उपलब्ध करुन देण्याची आवश्यकता असल्याने शिवछत्रपती क्रीडा संकुल, महाळुंगे-बालेवाडी, पुणे येथील क्रीडा सुविधा वापरापोटीच्या जमा होणाऱ्या शुल्कातून / भाड्याच्या जमा रकमेतून सद्यस्थितीत निधी उपलब्ध करण्यात यावा व त्यानंतर वित्त विभागाच्या मान्यतेने निधी उपलब्ध झाल्यानंतर त्याची प्रतीपूर्ती शिवछत्रपती क्रीडा संकुलाच्या संबंधित लेख्यामध्ये करण्यात यावी, असे सदर बैठकीत निदेश दिले. यानुसार संदर्भ क्र. ३ येथील दिनांक १३.०२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये आयुक्त, क्रीडा व

युवक सेवा, पुणे यांना कळविण्यात आले आहे. त्यानुषंगाने संबंधित लेखाशीर्षाखाली निधी उपलब्ध करुन देण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

एफ.सी. बायर्न फूटबॉल क्लब, म्युनिक जर्मनी यांचेशी करारनामा करुन जर्मनी येथे प्रशिक्षणासाठी जाण्यासाठी महाराष्ट्रातील १४ वर्षाखालील २० मुलांची निवड करण्यासाठी जिल्हा / विभाग / राज्यस्तरावर "महाराष्ट्र फुटबॉल कप स्पर्धा" आयोजित करुन निवड चाचणीद्वारे निवड करण्याच्या व तद्नुषंगिक बाबीवरील खर्च भागविण्याकरिता रु. १३०.०० लक्ष (अक्षरी रुपये एक कोटी, तीस लक्ष फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. वरीलप्रमाणे मंजूर केलेला निधी "मागणी क्र. ई-३ लेखाशिर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (३३) क्रीडा विद्यापीठ व क्रीडा अकादमी (३३) (०१), क्रीडा विद्यापीठाची स्थापना (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) २२०४-२०६४" या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाकडून वेळोवेळी निधी वितरणाबाबत देण्यात येणाऱ्या निर्देशांनुसार निधी वितरित करण्याबाबत निर्णय घेण्यात येईल.

४. यासंदर्भात निधी वितरणाच्या विहीत तरतूदींनुसार निधी वितरणाबाबत प्रस्ताव स्वतंत्रपणे आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास सादर करावा. त्यानुसार अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत व निधी उपलब्धतेनुसार निधी वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३१५१४२८१११५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.03.15 14:32:52 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राज्यपालांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई

४. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
६. सर्व मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
७. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक
९. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
१०. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
११. महालेखापाल (लेखाव अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. सर्व विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१४. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी (क्रीडा व युवक सेवा संचालनालयामार्फत)
१५. वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१६. नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती (क्रीयुसे-१).